# सौष्ठव

संपादक : श्रीधर तिळवे सहाय्यक संपादक : मंगेश बनसोड

## या पुरवणीतील साहित्य



## संपादकीय

ह्या अंकात श्रीधर तिळवेंच्या १५ कवितांबरोबर संतोष क्षिरसागर ह्यांच्या आठ कविता आम्ही देत आहोत. संतोष हा १९९० नंतरच्या महत्त्वाच्या चित्रकारांपैकी एक असून तो उत्कृष्ट कॅलीग्राफर आहे. बिल गेटस्च्या र. कृ. जोशी ह्यांच्या नेतृत्वाखाली चालू असलेल्या भारतीय भाषा प्रोजेक्टमध्ये तो कार्यरत आहे. एक समकालीन चित्रकार कवितेत कसा व्यक्त होतो ते पहाण्यासारखे आहे.

आम्ही पुन्हा एकदा नवीन कलावंत ,विचारवंत ह्यांना विनंती करतो की त्यांनी त्यांचे वाङ:मय सौष्ठवला पाठवावे. कुठलेही नियतकालिक वा पुरवणी तेच तेच लेखक देऊ लागले कि त्याचा ऱ्हास होतो हे व्हायचे नसेल तर नव्या दमाच्या ताज्या लेखकांनी साहित्य पुरवणे गरजेचे असते. आम्ही स्वतः अशा लेखकापर्यंत पोहोचण्यासाठी धडपडतो.

पण शेवटी आम्हालाही मर्यादा आहेत. कृपया आपण आपले साहित्य द्यावे.

श्रीधर तिळवे

# श्रीधर तिळवे ह्यांच्या १५ कविता

## कविता १

ईश्वर हा नुसता मख्ख आहे
ईश्वर हा दगड नाही
कारण दगडातून निदान मूर्ती तरी कोरता येते
ईश्वरातून काहीही कोरता येत नाही
ईश्वर हा नुसता मख्ख आहे
ईश्वर हा कीटक नाही
कारण कीटक निदान जगतो श्वास घेतो मरतो
ईश्वर जगतही नाही श्वासही घेत नाही मरतही नाही
ईश्वर हा नुसता मख्ख आहे
ईश्वर हा माती नाही
मातीतून काहीतरी उगवत बहरतं तरारतं
ईश्वरातून काहीही उगवत नाही बहरत नाही तरारत नाही
ईश्वर हा नुसता मख्ख आहे
ईश्वर हा राजा नाही
राजा निदान राण्या ठेवतो कलेला आश्रय देतो लढाया करतो
ईश्वर हा कुणालाच ठेवत नाही आश्रय देत नाही लढाया करत नाही
ईश्वर हा नुसता मख्ख आहे
ईश्वर हा चिन्ह नाही
चिन्ह निदान ज्ञान देते अनुभव निर्माण करते
ईश्वर काहीही देत नाही निर्माण करत नाही
ईश्वर हा नुसताच मख्ख आहे
म्हणूनच मला त्याचे भय आहे
कारण शहाणे म्हणतात
मांणूस आता हळूहळू स्वतःच ईश्वर बनत चाललाय.

## कविता २

मी शब्दात ठेवला पेजर
तर पेजरला आला गंध
मी शब्दात ओतला फोन
तर फोनला आली फुले
मी शब्दास पाजला टिव्ही
तर टिव्हीला फुटला स्तन
मी शब्दास भरवला संगणक
तर संगणकात स्रवले मन
भाषेबाहेर आलो तेव्हा
पेजर तसाच पेजरसारखा
फोन तसाच फोनसारखा
टिव्ही तसाच टिव्हीसारखा
संगणक तसाच संगणकासारखा
मी सारेच शब्दात भोगले
आणि कवीतेत कवी वारला.

## कविता ३

साबणाळलेली त्वचा तुझी अत्तरलेले नाक
काजळलेले डोळे तुझे आयुष्याचा काढतात बाक
लिपस्टिकलेले ओठ तुझे शाम्पुळलेले केस
क्रिमाळलेल्या अंगावरती वासनेचा एरियल फेस
ॲडवळणाचा देह तुझा चिन्हाळलेली काया
कल्पनेतच संभोग गेला आयुष्याचा कंडोम वाया

## कविता ४

तू कसली शक्ती
परवाच तर तुला कॅन्सर झाला
तू कसली राधा
एड्सबाधा झाली की
पळून जाशील बासरी मोडून
तू तर माझ्यासारखीच
दोन डोळे
दोन ओठ
एक नाक असलेली
साधी सरळ बाई
का खराब करू शाई
नसलेलं तुझ्यात शोधण्यात?

## कविता ५

कॉमरेड
तुमच्या लाल डगल्याचा रंग उडून गेला कुठं
कॉमरेड
त्याचा कधी झाल्या भिंती कधी चढली पुटं
कॉमरेड
तुमचे लिंग पूर्ण लाल नव्हते हा तुमचा गुन्हा होता काय
कॉमरेड
वर्गयुध्दाचे झेण्डे अर्ध्यावर उतरवले पक्षाने म्हणून तुम्ही निराश

आहात काय
कॉमरेड
सगळी हयात मार्क्सच्या नळीत माणसाची शेपूट घालून
तिला सरळ करण्यात गेली तरी ती राहिली वाकडी
म्हणून तुम्ही चिडीचूप्प आहात काय?
कॉमरेड
स्वत:चे आख्खे कौटुंबिक आयुष्य उद्‌वस्त झालं
कामगाराचे बोनस वाढवण्यात
म्हणून तुम्ही तुमच्या पोरांपुढे दिलगीर आहात काय
कॉमरेड
जे पाहिले समोर त्यांचा मोर न होता झाला कावळा
म्हणून तुम्ही अंधारात डोळे लपवताहात काय?
कॉमरेड
संपूर्ण पराजीत झाल्यानंतरही
पराभव पचवण्याची ताकद अद्यापही टिकवून आहात काय?
कॉमरेड
उत्तर देण्यासाठी तरी तुम्ही स्वत:त जिवंत आहात काय?

## कविता ६

।।१।।

तू येशील तिथूनच आता पूर्व देईल परफॉरमन्स
तू येशील तिथूनच आता सूर्य स्पॉन्सर करेल प्रकाश
तू असशील तिथेच आता दिसतील सारी म्युझिक चॅनेल्स
पाहणाऱ्यांचे फ्लॉपी डोळे कितीही फरफरोत आता गॉसिपात
चालू देत आता कितीही सॅन्डल्स स्कॅन्डल्सची स्पॉटलाईटात
मी फेकेन सारे दर्शक सारे टीआरपी रिमोट कन्ट्रोली
फेकेन प्रोड्यूसर्स उधळेन जर्नालिस्टस करेन मुक्त माझी ट्रॉली तू फक्त हो म्हण.

।।२।।

वाटले नव्हते मला कधी होईन मीही अनुरक्त
रक्त देईल संन्यासास तडी
देतील उष्ण अभिनयांना प्रतिसाद
त्वचेतील माझ्या काळ्या हुडहुडी
पण तू आलीस उडीसारखी
बुडी मारत जगद्‌बुडी
बिनधास आणि मनफाकडी
थोडी कपड्यात थोडी नागडी
वाफाळत चाललय हरक्षणी आत रक्तामधले विरक्त पाणी
झडत चाललीये त्वचेवरली फॅशनची जर्द भगवी करणी
सारे कपडे उतरवून झालोय तुझी मी फक्त मनधरणी
बनलोय केवळ रोमॅण्टीक शॉट
तुझ्याविना पेन्डीग पडत
बघत वाट झालोय ताठ
सेटमध्ये सडत सडत,
ये आणि उद्धार कर
किंवा टाळ उद्धवस्त कर

।।३।।

काय करशील तू आता
सेटवर येशील की नाकारशील ऑफर
सोने नाहीच अस्तित्वात माझ्या
नाकारावे असे बरेच कॉपर
माझा चेहरा माझे डाग
माझा देह माझे साग
स्विकारशील तू फेसलेस शेती
फेसलेस रिश्ते फेसलेस नाती
मला काहीच नाहीये सूचत
माझ्यात काहीच नाहीये उजळत
मी फक्त पाहतोय सीन्स
बदलतोय शॉट
पालटतोय स्पॉट
तो बघ एक लॉगशॉट
मन्रोला मुटलाय तुझा चेहरा
तुझा रंग तुझा नखरा
दोन्ही हातांची घालून घडी
ठेवतोय ओठांवर ओठांच्या लडी
तू मात्र हसत खिदळत
शॉटबाहेर बकबक उधळत
जणू शॉटशी संबंध नाही
काही देणे घेणे नाही
तो बघ एक मीडक्लोजअप
संभोगाचा सुटलाय आवेग धाडधाड
एकमेकात आपण उडतोय ताडताड
संभोगोत्तर रक्ताचा पहिलाच थेंब
बण्डखोर स्तनांचे बोंड चिम्ब
त्वचेवरती तुझ्या मारतोय थापा
देहात तुझ्या टाकतोय धापा
आणि हा मीड डीप शॉट
डायनिंग टेबलवर तुम्ही एकत्र
फॅमीली डीनर करत सावत्र
तू गातीयेस तुझी धून
करत उभी मुश्किल सुरावट
पेलत विश्वाची हिंसक आहट

एकच कल्ला एकच सावट
अवघं अन्न चाललय बदलत
सुराबरोबर माझ्या मांसात
जेवताय तुम्ही चाललाय जेवत
तुमच्या मांसात तुमच्या देहात
होत मी चाललोय क्रमशः नष्ट
तुमच्या ताटातून तुमच्या बोटात
तुमच्या ओठातून तुमच्या पोटात
शॉटमागून शॉट
शॉटमधून शॉट
फिरतोय कमरा
फिरतोय कॅमेरा
फिरवणाराही नाही आता
झालोय मीच कॅमेरा वहाता

**कविता ७**

||१||
डेन्टल हॉस्पिटलच्या बिनअँडी चेअरमध्ये
शेअर करत स्वतःचे दात
स्वतः बरोबरच
स्वतःलाच दातामध्ये पहात
भंजाळत
गंजाळत
सोसतो आहे मी दात गळून गेल्याचे निष्काळजी इवेंट
सेंट डेन्टीस्टच्या ज्ञानसत्तेत
ठेवतो आहे स्वतःचा रिअल जबडा
थोबडी जराही न हलवता
मला जाणवतय
वाचणार नाहीत आता माझ्या दाढा
मला उमजतय
थांबणार नाही आता पटाशींची कीड.

||२||
कळत नव्हते त्या वयात
केली मी उपेक्षा देहाची
व्यायाम करायच्या वयात फुगवले
एपीसोडचे स्नायू टॉक शोचे दण्ड
छाती फुगवण्याच्या वयात फुगवले
संगणकांचे बेडूक, टेलिफोनचे हाडूक
कबड्डी खेळायच्या वयात प्रसवल्या
स्पोर्टस चॅनेल्सच्या खेळ्या संगणक खेळांच्या जाळ्या
आणि मैथुन करायच्या वयात
करत बसलो हस्तमैथुन
लेटनाईटी अभिनेत्रीबरोबर
बेकलायटी इन्टेरियरात
फेकलायटी इनडोअरमध्ये

||३||
कोणत्या कल्पनेने झपाटलं होतं मला
कुणास ठाऊक
वीर्याचा प्रत्येक थेंब मी विरघळवला
ब्ल्यू फिलमच्या हॉटशॉटमध्ये
गोलंदाजी करत राहिलो स्क्रीनवरच्या सचीन तेंडूलकरला
आणि आख्खे आयुष्य केले मॅनेज
इवेंटमॅनेजमेंटमध्ये
जेव्हा ह्यातून बाहेर आली
तेव्हा समोर तू होतीस
खरीखुरी एकदम रिअल

||४||
तुला डायरेक्ट पाहण्याचेही नव्हते बळ
माझ्या टेलीव्हिजनी डोळ्यात
तुझ्या गालावरचा तीळ
सापडतच नव्हा माझ्या झुमइनना
सारेच करे धूसर होते लोबन सोडल्यासारखे
आणि एका क्षणी अचानक
पहाटेच्या सूर्याबरोबर तुझा टु शॉट घेऊन
मी थापली डेटींगची रोमॅण्टीक भाकरी
आणि तुला विचारलं
तू ह्यातील चतकोर तरी खाणार का?

||५||
दिले नाहीस तू मला उत्तर
साधली नाहीस एकवाक्यता
फक्त माझ्या दातातील फटी मोजत
दाखवत राहिलीस मला कवळी बसण्याची शक्यता
आणि संभोग करताना तुझी कवळी पडली तर
असा तडक प्रश्न विचारून
ॲक्टीवेटलीस कॅटवॉक करीत
दातादातांत दाढांदाढांत

||६||
कोणत्या वयात लागली माझ्या दातांना कीड
कोणत्या आळशीपणाचे फलीत माझ्या किडक्या दाढा
कोणत्या कुटील कंटाळ्याच्या ह्या प्रगाढ हस्तमुद्रा
कोणत्या अंगचोरपणाच्या ह्या थोर निराश तऱ्हा

सारेच प्रश्न घेऊन तोंडात
कोरत बसलोय मी माझे दात
समर्थन न करता
दंतमंजन न शोधता
माझ्यासमोर आहे
मला कवळी बसण्याची शक्यता
आणि संभोग करताना तुझी कवळी पडली तर
ह्या प्रश्नापुढे मी आहे उभा
सडनडेथसमोरील गोलकिपरसारखा
सावध आणि सजग
अगतिक आणि अपरिहार्य
दाती तृण धरून
दातांच्या कण्या करून

।।७।।
तुझ्या शुभ्र चमकदार दातांना
अभिवादन करून
पुलकीत होतोय नेहमीच माझा बेड
तुझ्याशी संभोग करण्याच्या कल्पनेनेही
ताठ होतोय त्याचा माठ देह
त्याच्या एकेका अवयवातून फुटतायत
शॉटमधून शॉट स्पॉटमधून स्पॉट
आणि माझा देह
उदात्त उन्नत महन्मधुर पोज देत
हरवून जातोय तुझ्या सिंहासन बत्तीशीत

।।८।।
स्त्रीवरचे प्रेम म्हणजे काय असते नेमके?
हलक्या शपथा?
खोटी वचने?
स्वत:ला मारलेल्या थापा?
कि चुकीची वाचने?
बाईत आई शोधायच्या फ्रॉईडीअन भानगडीत
कधीच पडत नाही मी
मला माहीत आहे
बाई बाई असते
आई आई
म्हणूनच तुला भेटतानाही करत राहतो मी
फेरेक्स आणि कंडोमच्या जाहिरातीत फरक
आणि अलग करतो ओळख आईच्या काळ्या त्वचेची
तुझ्या आयुर्वदिक देहाच्या टरमरीक स्कीनपासून
।।९।।
व्हायचा तिथंही होत नाहीये मी
भावूक आणि हळवा
संभोग देखील मोजत राहतो मी
कंडोमच्या संख्येत
गर्भपात होऊ नये म्हणून पाळतो
एमसीचे संकेत
गृहीत धरतो कवळीचे बील
तुझ्या टूथपेस्टच्या बीलात

।।१०।।
इतका सरळ बॅटीनं खेळत असूनही
आज बसलोय मी
डेन्टल हॉस्पीटलच्या बिनऑडी चेअरमध्ये
भंजाळत
गंजाळत
माझ्या दाताजवळ नाही दंतमंजन वा टूथपेस्ट
माझ्या मूळातून निघत नाहीयेत रुट कॅनालचे रुटस
माहीत आहे मला
कितीही चालून आल्या ॲड तरी
आता थांबणार नाही माझ्या दातांची कीड मॅड
आणि मला कवळी बसेल तेव्हा
तू दुसऱ्याच कुणासाठी बाळंत झालेली असशील
तुझ्या टेलिव्हिजनी देहात
पेप्सोडंटची उत्पादनं खपवत
स्वत:चे चकाचक दात ॲडमध्ये चमकवत.

## कविता ८

निघून चाललय विसावं शतक
आज आम्ही जेवलोय
उद्या कदाचित जेवणार नाही
आमच्या जेवणाची कसलीही हमी न देता
निघून चाललय विसाव शतक
अस्वस्थ आहे माझी आई
अस्वस्थ आहे आमची घागर
पाण्यासाठी यावं लागेल
तुमच्या सनातन विहीरीवर
त्यानंतर कदाचित तुम्ही
सिध्द कराल तुमची सांस्कृतिक महत्ता
आम्हाला पाण्यात बुडवाल तेव्हा
मृत्युही स्मशानात पाळेल अस्पृश्यता
आज घरी पाणी आलय
उद्या कदाचित येणार नाही
आमच्या पाण्याची कसलीही हमी न देता

निघून चाललय विसावं शतक
तुमचं तसं सारंच छान
सारंच गुबगुबीत सारंच शालीन
जोवर आम्ही मागत नाही
जगण्याइतकी हक्काची जमीन
उद्या कदाचित आमचे रक्त
खवळून उठेल जमिनीसाठी
सारे गायरान पेटवून देऊ
पेटून उठू पोटीपाठी
चालून याल पोलीस घेऊन
वस्तीभवती टाकाल डाव
फासलं पाडून मारून टाकाल
पुसून टाकाल निशाणनाव
आज आमचे घर आहे
उद्या कदाचित असणार नाही
आमच्या घराची कसलीही हमी न देता
निघून चाललय विसावं शतक
विसावं शतक
जे आलं होतं सगळ्यासाठी नागड्यानेच हंसासारखं
नाचत राहिलं तुमच्यासाठी फोन टिव्ही संगणकातून मोरासारखं
निघून चाललय निमूट आमच्यासमोरून बदकासारखं
जेवणातून तहानेतून घरातून
आम्हाला कपडे न देता
इतर शतकांसारखंच

## कविता ९

युध्द होतय
माझ्यासमोर टिव्हीवर युध्द होतय
आणि मला काहीच होत नाहीये
मला काहीच होत नाहीये
म्हणूनच बहुधा युध्द होतय
माझ्यात आता कता होतीये
कवितेमुळे युध्दात काहीच होत नाहीये
कोणीच वाचत नाहीये
कोणीच बरे होत नाहीये
माझ्यासमोर टिव्हीवर युध्द होतय
आणि माझ्यात कवितेखेरीज काहीच होत नाहीये
माझ्यात कवितेखेरीज काहीच होत नाहीये
म्हणूनच बहुधा युध्द होतयं
मला आता कवितेतून बाहेर पडायला हवे
म्हणजे युध्द टिव्हीतून बाहेर पडेल
मग आमनेसामने भिडू
तेव्हा दोघेही एकमेकांकडून मारले जाऊ
मग युध्द कवितेत जिवंत राहील
आणि मी टिव्हीत

## कविता १०

मी पेप्सी कोक पीत नाही
मी माझ्या तहानेला पाण्यामध्ये कमळू देतो
मी एम टिव्हीत डुबकत नाही
मी माझ्या बायकोमध्ये मॉडेलिंग न करता बुडून जातो
मी संगणक वापरत नाही
मी प्रोग्रामच्या चप्पला बाहेर काढून अनंतात नागडा हिंडतो
मी जीवन अटेन्ड करत नाही
मी संपूर्ण जीवनात अटेन्टिवली हजर असतो.

## कविता ११

विठ्ठल आहे एक महाथोर एपिसोड
वर्षानुवर्षे बडव्यांनी युक्तीपूर्वक चालवलेला
वर्षानुवर्षे पूर्वजांनी भक्तीपूर्वक पाहिलेला
रुक्मिणी आहे एक महामॅड ॲड
वर्षानुवर्षे बडव्यांनी स्पॉन्सर केलेली
वर्षानुवर्षे पूर्वजांनी कंझ्युम केलेली
दोन्हीकडे पाठ करून आता मी उभा
सत्याकडे तोंड करून .
तर साऱ्या वारकऱ्यांचे वार माझ्या पाठीत
आणि सत्य
विठ्ठलाचा एपिसोड पहात विठ्ठलासारखंच काळं पडत चाललेलं.

## कविता १२

अध्यक्षांचे ओठात काय घेतलीस
मी विचारणार नाही
खाली किती सरकलीस वर किती गेलीस
मी विचारणार नाही
माझ्यासाठी आहेस तू एक टेलिव्हिजन
ज्याने अध्यक्षांच्या व्यभिचाराविषयी एक वार्ता दिली
तू आहेस एक ब्लॅन्क कॉल
जो बोलू इच्छित होता बरंच
पण जप्त झाला कायद्यातच
तुला मिळालेली रांडप्रसिध्दी
माझ्या डोंबारवाड्याचा हेवा आहे
तुला मिळणारी नुकसानभरपाई
माझ्या भूकेकंगाल देशात मेवा आहे

आज तू न्यूज आहेस
उद्या तू अफवा होशील
म्हणून सांगतो मोनिका लुईन्स्की
पुन्हा कधी झोपशील तेव्हा
बाळग भान
सर्वत्र असणाऱ्या कॅमेऱ्याचं
आणि हेही लक्ष्यात ठेव की
ज्याच्याबरोबर झोपशील तो
भले अमेरिकाचा अध्यक्ष नसेल
पण कोणत्याही क्षणी वार्ताहर होऊ शकेल.

## कविता १३

मरण तर आहेच
हू केअर्स
देह आहे
इथे आणि आता
चाखू दे ह्या क्षणी ओठांना नागीणनशा
तुझ्या बॉबकटलेल्या केसात
करू दे मला चंगळशेती
दळत बिननात्याची बिनमातीची बिनसंबंधांची जाती
ओठापासून पोहचू दे योनीपर्यंत थेट
तिथून उलटत पाठीतून वीजा गोळा करत
मानेपाशी लॅण्ड होऊ दे वासनेचं जेट
आसक्तीच्या अनावर हातांना पकडू दे स्तनांचे जनावर
माणसाळवू दे बोण्ड
तोण्ड तोण्ड सोण्डळवत
पाठीमागून आयुष्य घालून
अस्तित्वाला आनंदी हिसके देईपर्यंत
पकडू दे मला तुझ्या दण्डाचे आयफेल टॉवर्स
आत्महत्या करू दे माझ्या घर्मबिंदूंना वरून उडी मारत
थेट तुझ्या स्तनात जसे शॉवर्स
मेंदूतल्या चोक्ड लॉंग शॉटला
झूम इन होत
पेटवू दे सुक्ष्मइन आनंदाचा उत्कट जाळ
काळाला लावत फाळ
फसफसू दे हा चवचाल बॉडीकोला
आणि सॉफ्ट होत कायमचे
थंड होऊ देत क्षणांचे ड्रींकआवेग
मरण तर आहेच
हू केअर्स
आनंद आहे
इथे आणि आता.

## कविता १४

सेक्सुअल सेक्सुअल म्हणता
टेक्स्च्युअल झालीस
देहात शोधत गेलो तर
चिन्हात सापडलीस
समागमाच्या उत्कट क्षणीही
सांडत राहिलीस स्त्रीमुक्ती
पुरुषसक्ती नाकारताना
बांधत राहिलीस पुरूषभक्ती
घण्टा बांध म्हटलीस म्हणून
उचलली घण्टा
तर कायद्याचा दावा करून
मांडलास उभा दावा
आता ह्या डिवोर्सक्षणी
पुन्हा उभा तुझ्याच देहात
पुन्हा तेच प्रेम घेऊन
मला न कळालेलं
तुलाही न सापडलेलं
कोवळं ऊन.

## कविता १५

सारे काटेच पडले
जे मिळाले त्याचे वाटे झाले
एक रस्ता होता त्याचे फाटे झाले
व्यभिचारांनी भरगच्च सिरीयलमध्ये
जपत राहिलो आत्मप्रक्षेपणात
मी माझा मोनोगॅमीचा मोनोटोनस शॉट
ऑन ऑफ करत राहिलो काळजाचा काऊंटरस्क्रीन
होण्यासाठी एडीट हिंसेचा सिनलॉट
ॲन्टेनावर बसले कावळे तेव्हाही
करत राहिलो कोकीळेचीच सॉंगलक्ष्यी प्रार्थना
चालून आले केबलवाले रिपेअर करण्यासाठी तेव्हाही
रिमोटवर दाबत राहिलो अष्टावधानी करूणाच
सर्वांनी मिळून कट करून
जेव्हा स्पॉन्सर केला माझा पोस्टमॉडर्न खून
तेव्हाही मुकाट्याने नाहीच मेलो
फक्त ॲडसारखा ब्रेक केला आयुष्याचा एपिसोड
आणि सोड सोड म्हणत
सोडून दिला पुनर्जन्म
प्रत्येकाच्या डोळ्यात



# संतोष क्षिरसागर यांच्या आठ कविता

## तुमचा माझा जीव पाहिला का कोणी?

अक्षरात ध्वनी तैसा असे।।१।।
तुमचे माझे रुप वेगळे ते असे
वर्णात वैविध्य तैसे आले।।२।।
शोध अरूपाचा आता तो कसला....?
आपल्यात 'अक्षर' ओळखावे।।३।।
झालो 'मी' अक्षर घेतला आकार
'ध्वनी' व्हावे आता अैसे वाटे।।४।।

मी विना अक्षरी लिहायचा प्रयत्न केलाही
केवळ शिरोरेषेतून तुझ्यापर्यंत पोहचण्याचा
तेव्हापासून असे हे बोडखे अक्षर मिरवतोय
रेष तुझ्यातच विलीन झाली नी
मागे पाचोळा अक्षरांचा उरला
निर्वात बनुन... माझ्यासाठी.
परत निरक्षर होता येत नाही....
हे तुला कळायला हवं....
पण एकच
साम्य
हे निरक्षरा तुझ्यासारखीच मला
आवाजांची स्वप्ने पडतात...
जागेपणी
इतकं तरी मला लिहूच दे.

## माझ्या शहरातली 'संदर्भ कविता' - माझ्या मुलासाठी नी नातवासाठी

तिन पायाच्या दोन वस्तु होत्या-एक सहाण/श्रहाण दुसरा पोळपाट
एकावर झिजायचे ते चंदन
दुसऱ्यावर बनत असे ती पोळी
दारात रांगोळ्यांचे दोन प्रकार होते-एक चिमटीने पेरायची दुसरी स्टीकरची
एक रेखाटायला वेळ लागायचा
दुसरी थुक न लावताही चिकटत असे.
काही गाळण्यासाठी दोन वस्तु होत्या- एक माठ नी दुसरी चाळण
एकात (माठ) झिरपून थंड पाणी उरायचे
दुसऱ्यातून धान्य गळून खडे रहायचे.
पक्षांचे दोन प्रकार होते एक कावळा नी दुसरे कबुतर
एक सर्वभक्षी वाऱ्याविरुध्द उडायचा
दुसरी निरूपद्रवी कुठेही रहायची.
पाण्याचे दोन प्रकार होते एक प्यायचे नी दुसरे समुद्राचे
एक जे कायम संपलेले असे
दुसरे तेव्हा प्रदुषित होत होते.
झाडे दोन प्रकारची होती एक जुनी उरलेली खोडं नी दुसरी कुंडीतली
एकाच्या लाकडाचा उपयोग चालू होता.
दुसऱ्याचे पाणी गळणे हा प्रश्न होता.
१९७२ साली दोन गोष्टी झाल्या होत्या एक कवि जिवंत होते दुसरी टि.व्ही आला होता.
एक नंतर गायब झाले.
दुसरी खूपच वाढत गेली.
शिक्षक दोन प्रकारचे होते एक शाळेतले दुसरे पालक
एक पालक झाल्यावर संपले
दुसरे जगण्यासाठी मरून गेले
हे माझ्या मुला/नातवा ही कविता वाचायला
तुला संदर्भ लागेल तोही देतो आहे .....
THIS "POEM OF REFRENCE' IS
WRITTEN IN "DEVNAGARI SCRIPT'
WHICH WAS EXTENSIVELY USED FOR
MARATHI & HINDI LANGUAGES
BOTH THIS LANGUAGES WHERE
USED IN COUNTRY CALLED INDIA OR BHARAT
OR HINDUSTAN.
ITS WRITTEN VERY FREELY WITH ALL MY
ORIGINAL
SPELING MISTAKES... BUT IGNORE IT JUST
AND FIND OUT MEANINGS FROM ENCYCLOPE-
DIA 21ST CENTURY-
IF AT ALL YOU WANT TO FEEL THIS THEN
CLOSE YOURE EYES & FORGET EVERYTHING
OF PAST.

## थिजलेले सातत्य

ा दवाखान्यात-
ुरकट पांढऱ्या जळमटी बोर्डावर रेड क्रांसची खूण जेमतेम उरलेली
ुसत चाललेले पण आमच्या डॉक्टरचे नाव
ोज वुडच्या जुन्या वळणाच्या घट्ट खुर्च्या नी लांबडे बाकडे
पाठ टेकल्या जागीच उगाच् चकाकलेले
वाराच फिरवतोय असे वाटणारा हलक्या वेगाचा लांबपाती पंखा
नकटी नाकं खाली झाल्याच्या थाटाची इलेक्ट्रीकची बटणं
रोज वूडचेच पार्टीशन वरुन थोडी मुकुटासारखी महिरप असलेले
त्याच्याच अर्ध्या भागात खुरकट काचा कोंदणात ठेवल्यासारख्या
काचातून पलिकडच्या व्यक्तीचा तुटक रेषातला भास
बाजुलाच हसऱ्या बाळाचे कॅलेंडर तसेच अनेक वर्ष
मोठ्या आवाजात आकड्यांच्या बोर्ड असलेले कॅलेंडर मात्र रोज
कंपाऊंडरने आठवणीने बदललेले
डॉक्टरांच्या फिरत्या खुर्चीवर मळकी उशी
टेबलावर लोळत स्थेतांस्कोप त्याचा सुध्दा
स्टीलचा गोल डॉक्टरांच्या हातानीच् स्वच्छ ठेवलेला
बाकी तो गेल्या अनुभवाचे रुप घेऊन तसाच्
-तसाच् ब्लड प्रेशरच्या हिरव्या रबरी ट्युबच्या फुग्या
ेजारी
ांब कल्लेवाले, रोज वुडच्या रंगा सारखेच एबोनाइटच्या
ेमचा जुना धुरकट चष्मा घातलेले डॉक्टर
मी- 'मी' येऊ का आत.....?....
डॉ-अरे ये ... ये.... बस की असा समोर
बघु काय झालं तुला ते ....?
मी - मला लवकर बरा करा डॉक्टर ...
डॉ - अरे मी तुला कसा बरा करणार?
मी रोगाला बरा करणार -
तुला जर 'मी' बरा करु शकलो तर काय....?
प्रश्नच मिटला -
तुला रोग झालाय नां? का रोगाला तू झालायस?
मी निघालो विषीण्णपणे-एक बरा झालेला माणूस
म्हणून गोळ्या न घेता - नी आता कळलं डॉक्टरांचू अक्षर असं का ते?

## आपण अगदी ब्रिटिशच आहोत

मी एक जिवंत माणूस आहे -
हे काय कमी आहे?
मी तरी शाई कागदावर सोडतांना
जरा विचारच् करतो -
पण तो पाऊस पाडतांना अजूनही वेळेवरच्
पाडतो - हे काय कमी आहे?
झाडे बाहेर येतात लाकडे, गवत होतात-
त्याचे कागद आपण करतो नी
त्यानेच् जमीन विकत घेतो-तरीही
तो गांधींसारखे 'चले जाव' म्हणत नाही-
हे काय कमी आहे?
आम्ही पाण्यात पापे धुतो जमल्यास तेच् विकतो
वाफ करून तो घेऊन जातो
शुध्द करून परत पाठवतो
हे काय कमी आहे?
इतके युगे तो असतो तरीही नसतो नी
सारे मॅनेज करायला तो कॉम्पीटर वापरत नाही
नी अजूनही माणसेच जन्माला घालतो
हे काय कमी आहे?
आपण सारा ग्रह विस्कळीत करतो-
तरीही त्याचे 'गुरुत्व' तो सोडत नाही
हे काय कमी आहे?
कल्पना येणं मर्यादांवर अवलंबून असते

## कॉकटेल नी ठरवणे

पार्टीला बोलावल्यास जावे
न बोलावल्यास अचानक आल्यागत जावे
पण जावे
अनेक लोकांच्या गर्दीत जरा ओशाळवाणे उभे रहावे
आत्मविश्वासाच्या खऱ्या वाटाव्या अशा त्यांच्या मिठ्या पहाव्या
ग्लास सहज न घाबरता उचलावा वेटरला स्मित हास्य द्यावे
निमंत्रण दिलेले असल्यास त्याच वेटरला चुटकीने बोलवावे
समोरच्याचे ऐकावे
ऐकतांना-आरपार पहावे
पलिकडे सावरलेले केस
नी त्यावेळी पडलेला पदर
वासाच्या सान्निध्यात कोण्या
एकीच्या बोटातील अंगठ्या
पहात रहाव्या नी उगाच
समोरच्याच्या बोलण्याचे आश्चर्य करावे
सारे कसे टापटीप नी ठरवून केलेले
ठरवून केलेली गोष्ट खोटी कशी असेल?
निदान आपल्याला सारे फक्त
खरेखरे भासवता आले पाहिजे
थोडा वेळ कोणी भेटत नाही आपण नी कुंडीतले झाड एकत्र, दोन
पेग नंतर

# सहज ठरवून विचार करावा

जन्म नी मृत्यूच काय तो ठरवता येत नाही?...
जास्त गंभीर होउ नये अलगद एक शेंगदाणा न चावता गीळला जातो.
बाकी सारे ओके

## नोंद

कोचावर रेललेला मी
समोर टिपॉयच्या ...
पलीकडे तुषार सिगरेट ओढत-
अॅश जमली की टिपॉयशी हात येऊन वाजत्येय चुटकी अॅशट्रेत्-
चुटक् चुटक्
रामदासचे स्वतःशीच गुणगुणणे ...
बसलाय टीपॉयशी गुडघे मुडपून ...
...नी वाजवतोय असंबध्द स्वतःचेच्... काहीसे खड्.. कट्..धीम्..कट्-
मागून वादळासारखी चालत गेली ती ...
नी आवाज मात्र पेन्सील शूज चा ...
प्लास्टिक कव्हरच्या फ्लोरींग वरचा ... टिक्... टॉक ...टिक्..टॉक
खस्कन दरवाजा खेचून उघडला वाटतं ...
होय प्रिन्सीपॉलच्या केबीनचाच तो ....
कारण ओढल्यावर .. मिटतांना मात्र
अलगद बंद होत ... बऱ्याच वेळानं ... लॅच बंद न होता आदळला 'तो'... धडाड्म्...
पंखा सतत आवाजतोय ... कणं... कट्... कणं... कट्...
अनेक आवर्तनानंतर त्याचा हा आवाज ...
पण मला मात्र सतत ऐकू येतोय...
या व्यतिरिक्त उरलेले वातावरण कसला तरी आवाज घेऊन आहेच...
कदाचित्... या इतर आवाजात तो पार्श्वभूमी सारखा असतो... न दिसल्यागत ...
तरे जाणवतोही... पण मग नोंद मात्र
या इतर गोष्टींची होते.... त्याला मी तरी काय करू?

## कारण हवंय्

चल् .....
चल् लवकर ...
चल् नां लवकर ...
कुठे...?...
नसते प्रश्न नकोत, लवकर चल...,
चल् चल् लवकर वेळ कमी आहे...
तू काहीच् कारण सांगत नाहीस् ...,
तुला सांगितला ना ... लवकर चल...,
पण ... पण
चल लवकर नाहीतर ... नाहीतर वेळ जाईल.
कुठे जाईल...
अरे हो ... खरंच् ....खरंच्... कुठे जाईल तो... कुठे बरं?
हे बघ तो जायचा तीथं जाईल नाटल्यास... पण तू चल बघू.
तू आधी हे कोडं स्पष्ट कर ... मगच्
ए काय यार ...
बरं, हे धर .... धर ... बघ... नीट ऐक.... झालं... झालं कोड स्प
ए यार हे काय कोड आहे .... नी स्पष्ट काय झालं...?
हे बघ... हे बघ तुला चल म्हणून नाही आलास तर मी खरं बोलेन
ए... बरं बरं.... मग तू बोलूनच टाक खरं काय ते ...
आपण सारे 'काही नाही' मिळवायला चालल्योत
तुला चलायला कारणच् हवय ना... घे.. दिलं -